**महाराष्ट्र शासन**

क्रमांकः एमसीए १०११/(३५८/२०११)/अर्थ-२

जलसंपदा विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः- ०२ जानेवारी, २०१२

**विषयः-** शासकीय अधिकाऱ्यांना २०११-२०१२ या वित्तीय वर्षामध्ये नवीन मोटार कार खरेदी करण्यासाठी निधी उपलब्धता प्रमाणपत्र.

**ज्ञापनः-**

१) अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ, औरंगाबाद
२) अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद
३) अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड

समासातील नियंत्रक अधिकारी यांना कळविण्यात येते की, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-अग्रिम-१०९३ /प्र.क्र.१४ / ९३/ विनियम, दिनांक ०१.०४.१९९३, क्रमांक-अग्रीम १०९३/ प्र.क्र.१६३/१४/विनियम, दिनांक २५.३.१९९४, क्रमांक अग्रिम १०९९/ प्र.क्र.१६/९९/ विनियम, दिनांक १०.३.२०००, क्रमांक अग्रीम २०१०/प्र.क्र.२६/१०/विनियम, दिनांक १७.७.२०१० व क्रमांक अग्रीम (व्याजदर) /२०.१०/प्र.क्र.२२/ विनियम, दिनांक २४.६.२०१० मध्ये दर्शविलेल्या अटीच्या अधीन राहून सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार नवीन मोटार कार खरेदीसाठी एकूण रु.५,४०,०००/- (रुपये पाच लक्ष चाळीस हजार फक्त) चे अग्रिम मंजूर करण्यास निधी उपलब्ध करण्यात येत आहे.

२. उपरोक्त अग्रिमाची नोंद सेवापुस्तकात घेण्याची दक्षता घ्यावी, तसेच कर्मचाऱ्यांची बदली झाल्यानंतर त्यांचे अंतिम वेतन प्रमाणपत्र देताना त्यामध्ये अग्रिमाच्या हप्त्याच्या अनुषंगाने आवश्यक नोंद घेण्यात यावी. मोटार कार अग्रिम कर्मचाऱ्यास / अधिकाऱ्यास सेवा कालावधीत एकदाच देय राहील.

३. यासंबंधी होणारा खर्च मागणी क्रमांक आय-७ खाली '७६१० शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे (२०२) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी अग्रिमे (योजनेत्तर)' (संगणक संकेतांक क्रमांक ७६१० ०४२५) या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे पत्र रवाना झाल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत अग्रिम मंजूर करुन अग्रिमाची रक्कम अर्जदारास त्वरित अदा केली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. अग्रिमाची रक्कम अदा केल्यावर दोन महिन्याच्या आत महालेखापाल कार्यालयात जाऊन खर्चमेळ जुळविल्याचे महालेखापाल कार्यालयातील कक्ष अधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीचे प्रमाणपत्र विहित विवरणपत्रात शासनास सादर करावे.

६. जर अर्जदार आपल्या कार्यालात कार्यरत नसतील तर सदर अर्जदाराचा निधी शासनास समर्पित करावा व तसे कळवावे.

७. सदरहू ज्ञापन हे वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.२३०/व्यय-१२, दिनांक १२ जुलै, २०११ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक **२०१२०१०२३२४२०५३४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्रः विवरणपत्र.

**( रा. मो. होळकर )**
**अवर सचिव (अर्थ)**

प्रतः- अर्थ-२ कार्यासन (संग्रहार्थ)

## विवरणपत्र

**शासन ज्ञापन क्र. एमसीए-१०११/(३५०/२०११)/अर्थ-२, दिनांक ०२ जानेवारी, २०१२ चे सहपत्र**

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | पदनाम | कार्यालयाचे नांव | मूळ वेतन | मंजूर अग्रीम |
|---|---|---|---|---|---|
| १ | ए. वाय. सरवदे | शाखा अभियंता | अ.अ., लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ, औरंगाबाद | २२९९०/- | १.८० |
| २ | वि. ज्ञा. कदम | शाखा अभियंता | अ.अ.,औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद | २३११०/- | १.८० |
| ३ | एस. जी. दोडे | उप विभागीय अभियंता | अ.अ., नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड | २५५६०/- | १.८० |
| | | | | **एकूण-** | ५.४० |

**( रा. मो. होळकर )**
**अवर सचिव (अर्थ)**